राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह ,हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमा साठी सन २०१४-१५ या आर्थीक वर्षा करीता अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याचे अनुदान वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय सा.आ.वि. क्र. एन सी डी २०१५ /प्र.क्र. २७ / आरोग्य-३अ
१० मजला, जि.टी.रुग्णालय संकुल
मंत्रालय, मुंबई-४००००१
दि. ३० मार्च २०१५.

**वाचा**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. T. २१०११/१/२०१३ N.C.D. NPCDCS (i) (b) दि. १६/०७/२०१४.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. T. २१०११/१/२०१३ N.C.D. NPCDCS (ii) (b) दि. १६/०७/२०१४.
३)केंद्र शासनाचे पत्र क्र. T. २१०११/१/२०१३ N.C.D. NPCDCS (i) (b) दि. १९/११/२०१४.
४)केंद्र शासनाचे पत्र क्र. T. २१०११/१/२०१३ N.C.D. NPCDCS (ii) (b) दि. १९/११/२०१४
५) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र.सआसे/ NCD/ नस्ती क्र. २८ हिस्सा/८९-९४/१५.
दि.१६/०१/२०१५.

**प्रस्तावना**

केंद्र शासनाकडुन राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमासाठी सन २०१४ -१५ या वित्तीय वर्षाकरीता अदिवासी उपयोजनेतंर्गत केंद्र शासनाकडुन रु. १०३.७५ लक्ष इतके अनुदान प्राप्त झाले आहे. सदर प्राप्त झालेले अनुदान त्याचप्रमाणे केंद्र शासनाकडुन प्राप्त अनुदानाच्या २५% प्रमाणातातील राज्य शासनाचा हिस्सा रु. ३४.५८ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची विनंती सह संचालक (असंसर्गजन्य रोग) , आरोग्य सेवा यांच्या मार्फत करण्यात आली होती . त्यानुसार राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमासाठी (NPCDCS) अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र शासनाकडुन प्राप्त रु. १०३.७५ लक्ष व राज्य शासनाचे २५ % प्रमाणे ३४.५८ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय

राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह ,हदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमासाठी सन २०१४ -१५ या वित्तीय वर्षाकरीता अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत केंद्र शासनाकडुन प्राप्त रु. १०३.७५ लक्ष व राज्य शासनाचे २५ % प्रमाणे रु. ३४.५८ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ साठी मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष**

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

७८९- अनुसुचित जातीसाठी विशेष घटक योजना

(०१)- अनुसुचित जाती उपयोजनेतंर्गत योजना

केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ %)

(०१) (२६)- राष्ट्रीय कर्करोग , मधुमेह, हदयरोग व स्ट्रोक प्रतीबंध व नियंत्रण कार्यक्रम.

(२२१० एफ ७११)

३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)

**(राज्य हिस्सा २५ %)**

(०१) (२७) राष्ट्रीय कर्करोग मधुमेह हदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम.

(२२१० एफ ७२९)

३१ - सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

३. उपरोक्त निधीमधुन या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखाधिकारी मुंबई यांचे कडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी,आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व सहसंचालक आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ) मुंबई हे नियंत्रण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २013/प्र.क्र.८५ /२०13 /अर्थसंकल्प -३ , दि. २५/०४/२०13 नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय सामाजीक न्याय व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.५८/२०१५/व्यय -१३ दिनांक ०५.०३.२०१५ व अनौपचारीक संदर्भ क्र. ३९५/अर्थोपाय /२०१४-१५ /दिनांक ०३.०३.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०२०००२१६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 15:21:21 +05'30'

**शेखर ढवळे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक , आरोग्य सेवा,मुंबई.
अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान .
सहसंचालक , आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग कक्ष),मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र .मुंबई (लेखा परिक्षा) /( लेखा व अनुज्ञेयता) १-
महालेखापाल महाराष्ट्र ) २-लेखा व अनुज्ञेयता ना (लेखा परिक्षा) /(गपुर.
अधिदान व लेखाधिकारी मुंबई.
निवासी लेखाधिकारी मुंबई.
वित्त विभाग, नियोजन विभाग, मंत्रालय , मुंबई३२-
कार्यासन अधिकारी .आरोग्य विभाग सार्वजनिक (अर्थसंकल्प)
निवडनस्ती.